राज्यातील रस्ते (रस्ते व पुल) यांची सुधारणा Hybrid Annuity तत्वावर करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक बांधकाम विभाग
## शासन निर्णय क्र. योजना २०१६/प्र.क्र.१६५/नियोजन - १अ

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१६

**वाचा :** केंद्र शासनाचे परिपत्रक्र क्र. NH-२४०२८/१४/२०१४-H (Vol -II), दि. ९ फेब्रुवारी, २०१६.

**प्रस्तावना :**

राज्यात सुमारे ३ लाख कि.मी. लांबीचे राष्ट्रीय महामार्ग, प्रमुख राज्य मार्ग, राज्य मार्ग, प्रमुख जिल्हा मार्ग, इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण रस्त्यांचे जाळे आहे. त्यापैकी सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारित सुमारे ९०,६०८ कि.मी. इतक्या लांबीचे प्रमुख राज्य मार्ग, राज्य मार्ग,प्रमुख जिल्हा मार्ग आहेत. सदर रस्त्यांची देखभाल दुरुस्ती तसेच नुतनीकरण योजनांतर्गत व योजनेत्तर निधीतून करण्यात येते. या रस्त्यांचे नुतनीकरण दर ५ वर्षांनी करणे आवश्यक आहे. रस्त्यांवर दिवसेंदिवस वाहनांची संख्या व त्यात अवजड वाहनांची संख्या मोठया प्रमाणावर वाढत आहे. त्यामुळे रस्त्यांची अवस्था वाईट झाली आहे.

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत सद्या EPC (Engineering procurement construction) सुधारणा कामांचे कंत्राट देण्यात येते. या पध्दतीत कामाच्या कालावधीतच कंत्राटदाराला संपूर्ण रक्कम अदा करण्यात येते. तथापि पुरेश्या निधी अभावी अनेक रस्त्यांची देखभाल दुरुस्ती व नुतनीकरणाची कामे करता येत नाहीत.राज्यातील रस्त्यांचा सर्वांगीण विकास करण्याकरीता मोठ्या प्रमाणात रस्ते सुधारणा करण्याकरीता केंद्र शासनाच्या Hybrid Annuity Model धर्तीवर राज्यात Hybrid Annuity योजना कार्यान्वित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राज्यातील रस्त्यांच्या सर्वांगीण विकासाकरीता सन २०१६-१७ पासून पुढील दोन वर्षाकरीता सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अखत्यारितील ९० हजार कि.मी. इतक्या लांबीच्या रस्त्यांपैकी १०,००० कि.मी. लांबीच्या रस्त्यांची सुधारणा करण्याकरीता केंद्र शासनाच्या Hybrid Annuity Model धर्तीवर राज्यात Hybrid Annuity योजना कार्यान्वित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे .

२. सदर योजना मार्च, २०१७ पासून कार्यान्वित होईल. प्रत्यक्ष बांधकामाचा कालावधी (Construction Period) २ वर्षे राहील. यामध्ये शासनाचा सहभाग ४०% म्हणजे रु.१२००० कोटी व खाजगी सहभाग ६०% म्हणजे रु.१८००० कोटी इतका राहील.

३. Hybrid Annuity योजना खालीलप्रमाणे राहील.

१. निविदा निश्चितीसाठी केंद्र शासनाच्या MORTH व NHAI यांच्या कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात येईल.
२. एकूण प्रकल्प किंमतीच्या ४०% रक्कम उद्योजकाला पाच समान हप्त्यात बांधकामाच्या कालावधीत अदा करण्यात येणार आहे.
३. सुरवातीला उद्योजकाला उर्वरित ६०% रक्कम समभाग व कर्जाव्दारे उभारुन प्रकल्प बांधकाम कालावधीत पूर्ण करावयाचा आहे.

४. उद्योजकाला प्राधिकाऱ्याने दर सहा महिन्याला उर्वरित ६०% पैकी ठराविक रक्कम प्रकल्पाच्या पूर्ततेनंतर अदा करण्यात येणार आहे.
५. ॲन्युईटीच्या रक्कमे बरोबर शिल्लक रक्कमेवर मिळणाऱ्या व्याजाची रक्कमही अदा करण्यात येणार आहे. या करीता व्याजाचा दर बँक दर + ३ % असा निश्चित केलेला आहे.
६. प्रकल्पाची किंमत महागाई निर्देशांकाशी जोडण्यात येऊन ती घाऊक बाजार मुल्यनिर्देशाक व ग्राहक मुल्यनिर्देशांकाच्या सरासरी इतकी असून त्याचे प्रमाण ७०:३० आहे.
७. प्रकल्पाच्या सवलत कालावधीमध्ये रस्त्यांच्या देखभाल व दुरुस्तीची जबाबदारी उद्योजकाची असणार आहे.
८. देखभाल व दुरुस्तीच्या खर्चाची देयके उद्योजकाने निविदेत भरलेल्या रक्कमेनुसार महागाई निर्देशांकाशी जोडल्याप्रमाणे प्राधिका-यामार्फत देण्यात येणार आहे.
९. सवलत कालावधी मध्ये प्रकल्प निहाय बांधकाम कालावधी आणि १५ वर्षांचा निश्चित कालावधीचा यांचा समावेश राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१६११३०११५८०५५८१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2016.11.30 12:03:59 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
३. मा. मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री (वित्त व नियोजन ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
७. अ.मु.स. (नियोजन), यांचे स्वीय सहायक, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अ.मु.स. (वित्त), यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. मा. प्रधान सचिव, यांचे स्वीय सहायक सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.मा. सचिव ( रस्ते), यांचे स्वीय सहायक सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
११.मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, सर्व
१२.मा. उप सचिव (रस्ते), यांचे स्वीय सहायक सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, सर्व
१४.निवडनस्ती - नियोजन - १अ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.